**सन २०१४-१५ मध्ये राज्याच्या कृषि विस्तार कार्यक्रमांना विस्तार विषयक सुधारणाकरिता सहाय्य (Support to State Extension Reforms) या केंद्र पुरस्कृत योजनेंतर्गत आयुक्त (कृषि) यांच्या स्तरावरील बाबींच्या अंमलबजावणीस वित्तीय मान्यता देणेबाबत.**

**महाराष्ट्र शासन**

**कृषि, पशुसंवर्धन, दुग्धव्यवसाय विकास व मत्स्यव्यवसाय विभाग**

**शासन निर्णय क्रमांक : कृषिका-१७१३/प्र.क्र.२१०/३-अे,**

मंत्रालय विस्तार भवन, मुंबई ४०० ०३२.

दिनांक:- २७ मार्च, २०१५

<u>संदर्भ :-</u> १) केंद्र शासनाचे प.क्र.मि.सं/F.No.२६(०६)/२०१४-AE, दि.१५.७.२०१४

२) केंद्र शासनाचे पत्र क्रमांक मि.सं/एफ.नं.३६-२८/२०१२-एई/एक्स्टेन.डेस्क, दिनांक ४ ऑगस्ट, २०१४

३) शासन निर्णय,कृषि, पशुसंवर्धन, दुग्धव्यवसाय विकास व मत्स्यव्यवसाय विभाग- संकीर्ण-२०१४/प्र.क्र.२१०/३ अे, दिनांक ६ सप्टेंबर,२०१४

४) शासन निर्णय,कृषि, पशुसंवर्धन, दुग्धव्यवसाय विकास व मत्स्यव्यवसाय विभाग- संकीर्ण-२०१४/प्र.क्र.२१०/३ अे, दिनांक २९ ऑक्टोबर,२०१४

५) केंद्र शासनाचे पत्र क्रमांक मि.सं/एफ.नं.३६-२८/२०१२-एई/एक्स्टेन.डेस्क, दिनांक ११ मार्च, २०१५

६) शासन निर्णय,कृषि, पशुसंवर्धन, दुग्धव्यवसाय विकास व मत्स्यव्यवसाय विभाग- संकीर्ण-२०१४/प्र.क्र.२१०/३ अे, दिनांक १६ मार्च,२०१५

<u>प्रस्तावना</u> :-

कृषि विस्तार कार्यक्रम पुनर्जिवित करुन शेतक-यांच्या गरजेनुरुप तसेच निकडीनुसार कृषि विस्तार कार्यक्रम राबविण्यासाठी " राज्याच्या कृषि विस्तार कार्यक्रमांना विस्तारविषयक सुधारणा करीता सहाय्य" ही केंद्र पुरस्कृत योजना ९० टक्के केंद्र व १० टक्के राज्य हिस्सा (शेतकरी मित्र घटक ५०:५० केंद्र :राज्य हिस्सा) या तत्वावर केंद्र शासनाच्या मान्यतेनुसार सन २००५-०६ पासून राबविण्यात येत होती. सन २०१०-११ पासून ही योजना जिल्हास्तरावर राबविण्याचे निश्चित झाले आहे. त्या अनुषंगाने प्रस्तावित निधी जिल्हाधिका-यांमार्फत संबंधित जिल्हयांना त्यांच्या आवश्यकतेनुसार उपलब्ध करण्यात येईल. केंद्रीय कृषि मंत्रालयाने राज्याच्या कृषि विस्तार कार्यक्रमांना विस्तार विषयक सुधारणा करण्याकरिता सहाय्य (आत्मा) या योजनेचा सन २०१४-१५ चा कार्यक्रम राबविण्यासाठी संदर्भाधीन दिनांक १५.७.२०१४ च्या पत्रान्वये रू.९८.४८३१ कोटी च्या कार्यक्रमास प्रशासकीय मान्यता दिली आहे. केंद्र शासनाच्या मान्यतेच्या अधिन राहून सन २०१४-१५ चा कार्यक्रम राबविण्याची संदर्भाधीन क्रमांक २ अन्वये रुपये ९८.४८३१ कोटी इतक्या कार्यक्रमास राज्याची प्रशासकीय मान्यता देण्यात आलेली आहे. केंद्र शासनाने " राज्याच्या कृषि विस्तार

कार्यक्रमांना विस्तारविषयक सुधारणा करीता सहाय्य" ही केंद्र पुरस्कृत योजना या योजनेसाठी पहिल्या हफ्यातंर्गत रु.१८.९२९८ कोटी इतके केंद्र शासनाच्या संदर्भाधीन क्र.१ च्या पत्रान्वये मंजूर केले. त्या अनुषंगाने रू.१८.९२९८ कोटी तसेच आयुक्तालय स्तरावर खर्च करण्यास रू.७.५७ लक्ष असे एकंदरीत रू.१९.००५५ कोटी त्यास शासन संदर्भाधीन क्र.४ च्या पत्रान्वये वित्तीय मान्यता देण्यात आली. केंद्र शासनाने त्यांच्या दि.२८ जानेवारी, २०१५ च्या पत्रान्वये रु.९.०० कोटी इतक्या अनुदानास प्रस्तुत कार्यक्रम राबविण्यास मंजूरी दिली.त्या अनुषंगाने रू.९.००.कोटी तसेच आयुक्तालय स्तरावर खर्च करण्यास रू.८.५७ लक्ष असे एकंदरीत रू.९.०८५७ कोटी त्यास शासन संदर्भाधीन क्र.६ च्या पत्रान्वये वित्तीय मान्यता देण्यात आली. आता. केंद्र शासनाने त्यांच्या दि.११ मार्च, २०१५ च्या पत्रान्वये रु.६.१९६८ कोटी इतक्या अनुदानास प्रस्तुत कार्यक्रम राबविण्यास मंजूरी दिली. यास्तव केंद्र शासनाच्या निधीतील रु.६.१९६८ कोटी इतका निधी " राज्याच्या कृषि विस्तार कार्यक्रमांना विस्तारविषयक सुधारणा करीता सहाय्य" ही केंद्र पुरस्कृत योजना” ही योजना क्षेत्रीय स्तरावर राबविण्यासाठी वितरीत करणे शासनाच्या विचाराधीन आहे.

**शासन निर्णय:-**

१ " राज्याच्या कृषि विस्तार कार्यक्रमांना विस्तारविषयक सुधारणा करीता सहाय्य" या योजनेचा कार्यक्रम राबविण्याकरिता केंद्र शासनाने त्यांच्या दिनांक १५.७.२०१४ च्या पत्रान्वये रुपये ९८.४८३१ कोटी चा कार्यक्रमास प्रशासकीय मान्यता यापूर्वी दिली आहे. सदरहू योजना ९० टक्के केंद्र व १० टक्के राज्य या तत्वावर राबविण्यात येत असून राज्य हिश्याचा १० टक्के निधी जिल्हाधिका-यामार्फत संबंधित जिल्ह्यांना त्यांचे आवश्यकतेनुसार उपलब्ध करण्यात येईल. केंद्र शासनाने वितरीत केलेला प्रस्तुत योजनेतंर्गत केंद्र शासनाचा तीसरा हफ्ता रु.६.१९६८ कोटी इतक्या निधीस राज्य शासनाची वित्तीय मान्यता देण्यात येत आहे. सदरहू रक्कमेचा कोषागाराशी आहरण व संवितरणासाठी सहाय्यक संचालक (लेखा-१), कृषि आयुक्तालय, पुणे यांना आहरण व संवितरण अधिकारी घोषित करण्यात येत असून संचालक (आत्मा), तथा नोडल अधिकारी (आत्मा) कृषि आयुक्तालय, पुणे यांना नियंत्रण अधिकारी म्हणून घोषित करण्यात येते.

२. सन २०१४-१५ मध्ये सदर योजनेची अंमलबजावणी केंद्र शासनाच्या दिनांक १५.७.२०१४ च्या पत्रात नमूद केलेल्या मार्गदर्शक सुचना, अटी व शर्तीनुसार करण्यात यावी. या योजनेच्या अंमलबजावणीचा आढावा संचालक, आत्मा तथा कृषि नोडल अधिकारी, कृषि आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे यांनी वेळोवेळी घ्यावा तसेच खर्च केलेल्या अनुदानाचा घटक निहाय तपशिल राज्य शासनास विहीत मुदतीत पाठविण्याची जबाबदारी संचालक आत्मा तथा कृषि नोडल अधिकारी, कृषि आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे यांची राहील.

३. सदर मंजुर अनुदानातून होणारा विभाग निहाय खर्च त्या त्या महिन्याच्या दुसऱ्या आठवड्यात शासनास सादर करण्याची दक्षता नियंत्रक अधिकारी यांनी घ्यावी.

४. सन २०१४-१५ करिता मंजूर केलेले केंद्र शासनाकडील रु.६.१९६८ कोटी हा केंद्र शासनाचा निधी खालील शिर्षाखाली मंजूर व अर्थसंकल्पित तरतूदीनुसार भागविण्यात यावा.

मागणी क्रमांक डी-३

२४०१,पीक संवर्धन

१०९ विस्तार व प्रशिक्षण

(०१)(४४) राज्याच्या कृषि विस्तार कार्यक्रमांना विस्तार विषयक सुधारणा करण्याकरिता सहाय्य- उप अभियान (केंद्र हिस्सा ९०%)

(२४०१ ४४४५)

३३ अर्थसहाय्य

५. हे आदेश वित्त विभाग/नियोजन विभागाच्या अनुक्रमे अनौपचारिक संदर्भ क्र.५४९/१४३१, दिनांक २७.३.२०१५ व अनौपचारिक संदर्भ क्र.३२/व्यय-१,दिनांक २७.३.२०१५ तसेच मा. अपर मुख्य सचिव (कृषि) यांच्या मान्यतेने निर्गमित करण्यात येत आहेत.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१५०३३०११०७०६८५०१ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Vidyadhar Mahadev Borkar

Digitally signed by Vidyadhar Mahadev Borkar
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Section Officer, postalCode=400032, st=Maharashtra, cn=Vidyadhar Mahadev Borkar
Date: 2015.03.30 11:18:55 +05'30'

**( वि.म.बोरकर )**

**कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१. कुलगुरु, मराठवाडा कृषि विद्यापीठ, परभणी,
२. कुलगुरु, डॉ.पंजाबराव देशमुख कृषि विद्यापीठ, अकोला,
३. कुलगुरु, महात्मा फुले कृषि विद्यापीठ, राहुरी, जि. अहमदनगर,
४. कुलगुरु, डॉ.बाळासाहेब सावंत कोंकण कृषि विद्यापीठ, दापोली, जि. रत्नागिरी,

५. सचिव (पदुम), कृषि व पदुम विभाग, मंत्रालय, मुंबई,
६. सचिव (मृद व जलसंधारण), ग्राम विकास विभाग, मंत्रालय, मुंबई
७. सचिव (ग्राम विकास), ग्राम विकास विभाग, मंत्रालय, मुंबई
८. सर्व विभागीय आयुक्त,
९. कृषी आयुक्त, महाराष्ट्र राज्य, पुणे, (५ जादा प्रतींसह)
१०.सर्व मा. विधानसभा/परिषद सदस्य
११.आयुक्त, सहकार, महाराष्ट्र राज्य, पुणे,
१२.आयुक्त, पशुसंवर्धन, महाराष्ट्र राज्य, पुणे
१३.आयुक्त, मत्स्यव्यवसाय, महाराष्ट्र राज्य, मुंबई
१४.आयुक्त, दुग्धव्यवसाय विकास, महाराष्ट्र राज्य, मुंबई
१५.साखर आयुक्त, महाराष्ट्र राज्य, पुणे
१६.सर्व जिल्हाधिकारी,
१७.सर्व जिल्ह्याचे मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद,
१८. संचालक आत्मा तथा कृषि नोडल अधिकारी, कृषि आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे.(५ जादा प्रतींसह)
१९.सर्व संचालक / कृषि सहसंचालक, कृषि आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे,
२०.सर्व विभागीय कृषि सहसंचालक,
२१.संचालक (पणन), सहकार विभाग, महाराष्ट्र राज्य, पुणे
२२.संचालक, समाज कल्याण, महाराष्ट्र राज्य, पुणे
२३.संचालक, रेशीम उद्योग पुणे मुंबई रस्ता, शासकीय दूध डेअरीसमोर, पुणे ४११ ००३
२४.संचालक, सामाजिक वनीकरण, महाराष्ट्र राज्य, पुणे,
२५.संचालक, वसंतराव नाईक राज्य कृषि विस्तार व्यवस्थापन प्रशिक्षण संस्था, नागपूर
२६.प्राचार्य, विभागीय कृषि विस्तार व्यवस्थापन प्रशिक्षण संस्था,खोपोली,ता.खानापूर,जि.रायगड.
२७.प्राचार्य, विभागीय कृषि विस्तार व्यवस्थापन प्रशिक्षण संस्था,गेट क्रमांक ४,शहाजी नगर, लाईन बजार,कोल्हापूर,
२८. प्राचार्य, विभागीय कृषि विस्तार व्यवस्थापन प्रशिक्षण संस्था,बुलडोजर युनिट,शिवाजी नगर, पोस्ट ऑफीस जवळ, च-होली , पुणे.

२९.प्राचार्य, विभागीय कृषि विस्तार व्यवस्थापन प्रशिक्षण संस्था,संभाजी चौक, उंटवाडी रोड, नाशिक

३०.प्राचार्य, विभागीय कृषि विस्तार व्यवस्थापन प्रशिक्षण संस्था,.शहानुर मिया, दर्गा रोड, औरंगाबाद.

३१.प्राचार्य, विभागीय कृषि विस्तार व्यवस्थापन प्रशिक्षण संस्था,तपोवन रोड, अमरावती

३२.प्राचार्य, विभागीय कृषि विस्तार व्यवस्थापन प्रशिक्षण संस्था,बंगला क्रमांक ६२/१, धरमपेठ, व्ही.आय.पी.रोड, सीव्हील लाईन, नागपूर.

३३.सर्व जिल्ह्यांचे जिल्हा अधिक्षक कृषि अधिकारी,

३४.महालेखापाल, महाराष्ट्र-१ (लेखा व अनुज्ञेयता/लेखापरीक्षा),मुंबई

३५.महालेखापाल, महाराष्ट्र-२ (लेखा व अनुज्ञेयता/लेखापरीक्षा),नागपूर,

३६.सर्व जिल्ह्यांचे जिल्हा कोषागार अधिकारी,

३७.ग्रंथपाल, विधिमंडळ सचिवालय ग्रंथालय, मुंबई,

३८. महासंचालक, माहिती व जनसंपर्क संचालनालय, मुंबई,

३९.नियोजन विभाग / वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई,

४०.सर्व सहसचिव / उपसचिव / अवर सचिव, कृषि व पदुम विभाग,( कृषि प्रभाग), मंत्रालय, मुंबई,

४१.मा. मंत्री (कृषि) यांचे खाजगीसचिव,

४२.मा. राज्यमंत्री (कृषि) यांचे खाजगीसचिव

४३.निवड नस्ती